**सन २०१८-१९ करीता स.सा.का.ना कर्जे या योजनेतंर्गत श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि.,कुमठे, पो. टिकेकरवाडी ता.दक्षिण सोलापूर,जि. सोलापूर या कारखान्यास ऊस खरेदी कर भरण्यासाठी बिनव्याजी कर्ज मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र. ०८ (शिकाना) /३-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ नोव्हेंबर २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका १०८९/१०११/सीआर १३८/८९/३स, दिनांक २३ जानेवारी, १९९०

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका १०८९/१०११/प्र.क्र. १३८/८९/३सी, दिनांक १० जून, १९९२

३) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. साआ/कक्ष-६/अर्थ-३/सिध्देश्वर/ उखक/बिव्याकर्ज/रुपां/१३८३/२०१८, दि.११.०५.२०१८ चे पत्र.

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/ अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

**शासन निर्णय :-**

नवीन सहकारी साखर कारखान्यांनी पहिल्या पाच वर्षात प्रत्यक्ष गाळलेल्या ऊसावरील ऊस खरेदी कर भरण्याऐवजी सदर रकमेची बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्याचे शासनाचे धोरण आहे. या धोरणानुसार बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास अनुज्ञेय असलेल्या श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या साखर कारखान्याच्या एकूण ऊस खरेदी कराच्या रुपये ५,५६,८२,१५३/-(अक्षरी रुपये पाच कोटी छपन्न लाख ब्याएंशी हजार एकशे त्रेपन्न फक्त) रकमेचे बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

**०२.** श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या कारखान्यांना मंजूर करावयाचा निधी, आर्थिक वर्ष इत्यादीबाबतची माहिती ऊस खरेदी कराच्या रकमेचा तपशील खालील प्रमाणे आहे:-

| | **सन** | **देय रक्कम** | **ऊस खरेदी कर** |
|---|---|---|---|
| श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर | २००५-०६ | १,४३,०९,२७९/- | १,४३,०९,२७९/- |
| | २००६-०७ | करमाफ़ी | करमाफ़ी |
| | २००७-०८ | १,२१,७१,८४९/- | १,२१,७१,८४९/- |
| | २००८-०९ | १,३०,८१,८९७/- | १,३०,८१,८९७/- |
| | २००९-१० | ३,२६,५९,९७०/- | १,६१,१९,१२८/- |
| | **एकूण** | **७,२२,२२,६८७/-** | **५,५६,८२,१५३/-** |

०३. सदर सहकारी साखर कारखान्याची वरील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या गळीत हंगामातील ऊस खरेदी कराची रक्कम बिनव्याजी कर्जात रुपांतरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. कारखान्याने ऊस खरेदी कराची निर्धारणा विक्रीकर आयुक्तांकडून करुन घ्यावी.

०४. शासन असेही आदेश देत आहे की, वरील प्रमाणे मंजूर केलेली बिनव्याजी कर्जाची एकूण रुपये ५,५६,८२,१५३/-(अक्षरी रुपये पाच कोटी छपन्न लाख ब्याएंशी हजार एकशे त्रेपन्न फक्त) "ही मागणी क्रमांक व्ही-५, ६४२५- सहकारासाठी कर्जे, (००) १०८, इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०३) सहकारी साखर कारखाने, (०३) (०१) सहकारी साखर कारखान्यांना कर्जे(कार्यक्रम) (६४२५ ०१४४), ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून संबंधित सहकारी साखर कारखान्याच्या खाती बिनव्याजी कर्ज म्हणून दाखविण्यात यावी. हा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर झालेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०५. शासन असेही आदेश देत आहे की, साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पुस्तकी समायोजनाव्दारे ही रक्कम संबंधित सहकारी साखर कारखान्याच्या ऊस खरेदी कराच्या थकबाकीपोटी वसूली म्हणून "००४०-विक्रीकर-१०४- ऊस खरेदी वरील कर या खाली ०१-कर वसूली" या लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावी.

०६. या कर्जाच्या वसूलीबाबत असे आदेश देण्यात येत आहे की, ज्या वर्षाच्या ऊस खरेदी करासाठी हे बिनव्याजी कर्ज मंजूर करण्यात आलेले आहे, त्या वर्षाच्या कर्जाची वसूली त्या वर्षापासूनच्या सहाव्या वर्षात ते कर्ज वसूलीस पात्र झालेले आहे असे समजून त्या कर्जाची वसूली पाच समान वार्षिक हप्त्यात करावी. त्यानुसार ज्या सहकारी साखर कारखान्याच्या बाबतीत कर्जाचे हप्ते वसूलीस पात्र झालेले आहेत, अशा हप्त्यांची रक्कम साखर आयुक्तांनी तात्काळ वसूल करुन शासनास भरणा करावी. वरील कर्जाची वसूली पुढील जमा लेखाशिर्षाखाली "००४० विक्री, व्यापार इत्यादीवरील कर, १०६ ऊस खरेदीवर कर, (०१) (०१) कर वसुली (००४००३१६) " मध्ये जमा करावी. यासाठी शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र. सीएसके- १०७६/६९७४२/१३-सी, दिनांक ७ एप्रिल, १९९७ अन्वये ठरविण्यात आलेल्या पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

०७. साखर आयुक्त, पुणे यांना असे आदेश देण्यात येत आहे की, श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या कारखान्यास ऊस खरेदी कर भरण्यासाठी मंजूर केलेल्या बिनव्याजी कर्जाची रक्कम सदर कारखान्याच्या ऊस खरेदी कर थकबाकीपोटी संबंधित लेखाशिर्षाखाली समायोजन करण्यासाठी महालेखापाल, मुंबई /महालेखापाल, नागपूर यांच्या कार्यालयाशी संपर्क साधून सदर रक्कमेचे प्रत्यक्ष समायोजन करुन घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी. तसेच, समायोजन पूर्ण झाल्याचा अहवाल विक्रीकर आयुक्त/वित्त विभाग/सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना पाठवावा. श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर हा कारखाना बहुराज्यीय झाला असल्याने सदर कराची वसूली होण्यासाठी संचालकांची वैयक्तिक हमी घेण्याच्या अधीन सहमती दर्शविण्यात येत आहे. त्याबाबत योग्य ती दक्षता घेण्यात यावी.

०८. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ मधील संबंधित अटींची पूर्तता झाली आहे. साखर आयुक्त, पुणे यांनी सदर तरतूद वितरीत करताना तसेच खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व

वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या, तसेच वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

०९. सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र.:अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये विभागास प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११३१५४९००७९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pallavi Kishor Kolekar

Digitally signed by Pallavi Kishor Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f84604467eafca305d8db43be6ea88c5e39fe2118634ad09d33c9b0d765d6e26,
serialNumber=e01062e9c78c4616d627a8cf0a5b109edc1a71f9a6cd0f92b84ddfcfc6c858ac, cn=Pallavi Kishor Kolekar
Date: 2018.11.13 15:53:00 +05'30'

(पल्लवी कोळेकर)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर
२. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. प्रादेशिक सहसंचालक (साखर) औरंगाबाद/पुणे.
५. अप्पर विक्रीकर आयुक्त, औरंगाबाद/पुणे.
६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद/पुणे.
८. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, जालना/सोलापूर.
९. सहाय्यक विक्रीकर आयुक्त, जालना/सोलापूर.
१०. वित्त विभाग (कराधान-३/व्यय-२)
११. कार्यकारी संचालक, श्री.सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता.दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर
१२. निवडनस्ती - ३ स.